**वन्यप्राण्यांचे हल्ल्यामुळे मनुष्यहानी व पशुधन मृत / अपंग / जखमी झाल्यास द्यावयाचे अर्थसहाय्य मध्ये वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१८/प्र.क्र.२६७/फ-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ जुलै, २०१८

वाचा :-

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-१०.०८/प्रक्र.२७०/फ-१, दिनांक ०२/०७/२०१०.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/प्रक्र.३३७/फ-१, दिनांक ३०/०३/२०१३.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/प्रक्र.३३७/फ-१, दिनांक २९/०५/२०१३.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-०४१३/प्रक्र.१२३/फ-१, दिनांक २५/११/२०१३.
५. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/प्रक्र.३३७/फ-१, दिनांक १६/०१/२०१५.
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-०९१५/प्रक्र.३०५/फ-१, दिनांक ११/११/२०१६.

प्रस्तावना :-

वाघ, बिबटया, अस्वल, गवा (बायसन), रानडुक्कर, लांडगा, तरस, कोल्हा, मगर, हत्ती व रानकुत्रे (ढोल) यांच्या हल्ल्यात मनुष्य हानी झाल्यास दिनांक ०२/०७/२०१०, दिनांक ३०/०३/२०१३, दिनांक २९/०५/२०१३ व दिनांक १६/०१/२०१५ च्या शासन निर्णयामधील तरतुदींनुसार अर्थसहाय्याची रक्कम संबंधितांना अदा करण्यात येते. तसेच उक्त वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामुळे गाय, बैल, म्हैस, मेंढी, बकरी किंवा इतर पशुधनाचा मृत/ अपंग / जखमी झाल्यास दिनांक ११/११/२०१६ च्या शासन निर्णयामधील तरतुदींनुसार अर्थसहाय्याची रक्कम संबंधितास अदा करण्यात येत आहे. वन्यप्राणी हल्यामध्ये मनुष्य हानी तसेच पशुधन मृत/ अपंग / जखमी झाल्यास देण्यात येणा-या अर्थसहाय्याची रक्कम कमी असल्यामुळे त्यामध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच मा. मंत्री (वित्त आणि नियोजन, वने), महाराष्ट्र राज्य यांनी सन २०१८ चे दुसरे (पावसाळी) अधिवेशनात दिनांक ०९/०७/२०१८ रोजी विधानसभेत पुरवणी मागण्यांचे चर्चे दरम्यान वन्यप्राण्याकडुन होणा-या मनुष्यहानी व पशुधन हानी प्रकरणी देण्यात येणा-या अर्थसहाय्याचे रक्कमेत वाढ करण्याची घोषणा केली आहे. त्यास अनुसरून शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

१. वाघ, बिबटया, अस्वल, गवा (बायसन), रानडुक्कर, लांडगा, तरस, कोल्हा, मगर, हत्ती व रानकुत्रे (ढोल) यांच्या हल्ल्यामुळे मनुष्य हानी तसेच पशुधनाचा मृत्यू झाल्यास खालीलप्रमाणे अर्थ सहाय्य देण्यात यावे.

**व्यक्ती मृत झाल्यास, कायम अपंग झाल्यास किंवा गंभीररित्या जखमी झाल्यास खालील प्रमाणे अर्थसहाय्याची रक्कम देण्यात यावी.**

| अक्र | तपशिल | देय असलेल्या अर्थसहाय्याची रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | व्यक्ती मृत झाल्यास | रुपये १०,००,०००/- (रु. दहा लाख फक्त) |
| २ | व्यक्ती कायम अपंग झाल्यास | रुपये ५,००,०००/- (रु. पाच लाख फक्त) |
| ३ | व्यक्ती गंभीररित्या जखमी झाल्यास | रुपये १,२५,०००/- (रु. एक लाख पंचवीस हजार फक्त) |
| ४ | व्यक्ती किरकोळ जखमी झाल्यास | औषधोपचारासाठी येणारा खर्च देण्यात यावा. मात्र खाजगी रुग्णालयात औषधोपचार करणे अगत्याचे असल्यास त्याची मर्यादा रुपये २०,०००/- (रु. विस हजार फक्त) प्रती व्यक्ती अशी राहील. शक्यतो औषधोपचार शासकीय/जिल्हा परिषद रुग्णालयात करावा. |

**पशुधन मृत्यू/अपंग/जखमी प्रकरणी द्यावयाची नुकसान भरपाई**

| अ.क्र. | पशुधनाचे (पाळीव प्राण्याचे) नाव | देय असलेल्या नुकसान भरपाईची रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | गाय, म्हैस व बैल यांचा मृत्यु झाल्यास | बाजार भाव किंमतीच्या ७५% किंवा रु. ४०,०००/- (रू. चाळीस हजार फक्त) या पैकी कमी असणारी रक्कम. |
| २ | मेंढी, बकरी व इतर पशुधन* यांचा मृत्यू झाल्यास {* वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ मधील कलम २(१८-अ) प्रमाणे } | बाजार भाव किंमतीच्या ७५% किंवा रु.१०,०००/- (रू. दहा हजार फक्त) या पैकी कमी असणारी रक्कम. |
| ३ | गाय, म्हैस, बैल, या जनावरांना कायम अपंगत्व आल्यास | बाजार भाव किंमतीच्या ५०% किंवा रु. १२,०००/- (रू. बारा हजार फक्त) या पैकी कमी असणारी रक्कम. |

| | | |
|---|---|---|
| ४ | गाय, म्हैस, बैल, मेंढी, बकरी व इतर पशुधन जखमी झाल्यास | औषधोपचारासाठी येणारा खर्च देण्यात यावा. औषधोपचार शासकीय/जिल्हा परिषद पशुचिकित्सालयात करणेत यावा. देय रक्कम मर्यादा बाजार भावाचे २५% किंवा रु. ४०००/- (रु. चार हजार फक्त) प्रति जनावर यापैकी कमी असणारी रक्कम, उक्त नुकसान भरपाई पशुवैद्यकीय आधिका-याने दिलेल्या प्रमाणपत्राचे आधारे देण्यात यावी. |

२. वन्यप्राणी हल्ल्यामुळे मृत झालेल्या व्यक्तीच्या वारसांना देय अर्थसहाय्याच्या रक्कमेपैकी रु. ३,००,०००/- (रु. तीन लक्ष फक्त) देय असलेल्या व्यक्तीला तात्काळ धनादेशाद्वारे व उर्वरित रक्कम रु. ७,००,०००/- (रु. सात लक्ष फक्त) त्यांच्या राष्ट्रीयकृत बॅंकेत असलेल्या दरमहा व्याज देणा-या संयुक्त खात्यामध्ये ठेव रक्कम (फिक्स डिपॉसीट) जमा करण्यात यावी.

३. वन्यप्राणी हल्ल्यामुळे व्यक्ती मृत/ अपंग / जखमी झाल्यास मृत व्यक्तीच्या वारसांना अर्थसहाय्य देण्यासाठी असलेल्या इतर अटी व शर्ती शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-१०.०८/प्रक्र.२७०/ फ-१, दिनांक ०२/०७/२०१०, शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-२०१२/ प्रक्र.३३७/ फ-१, दिनांक ३०/०३/२०१३, शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी- २०१२/ प्रक्र.३३७/ फ-१, दिनांक २९/०५/२०१३ प्रमाणे कायम राहिल.

४. वन्यप्राणी हल्ल्यामुळे पशुधनाचा मृत/ अपंग / जखमी झाल्यास अर्थसहाय्य देण्यासाठी असलेल्या अटी व शर्ती शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.डब्ल्यूएलपी-०९१५/ प्रक्र.३०५/फ-१, दिनांक ११/११/२०१६ प्रमाणे कायम राहिल.

५. उपरोक्त तरतुदी शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांका पासून लागू करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. विवि/शिकाना/२१२, दिनांक ११.०७.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७१२१४२८२१२५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.07.12 14:28:56 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रत माहिती आणि उचित कार्यवाहीसाठी :-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबइ
८) महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वनविकास महामंडळ, नागपूर
१३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) नागपूर/मुंबई.
१५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१६) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्राणी संग्रहालय प्राधिकरण, नागपूर.
१७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), सर्व.
१८) मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे
१९) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
२०) मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
२१) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
२२) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर
२३) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
२४) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व बोर व्याघ्र प्रकल्प, नागपूर
२५) उपवनसंरक्षक (प्रादेशिक) सर्व.
२६) उपवनसंरक्षक (वन्यजीव) ठाणे.

२७) विभागीय वन अधिकारी सांगली/उस्मानाबाद/बीड / हिंगोली /चिपळूण.

२८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर.

२९) वित्त विभाग (व्यय-१० कार्यासन), मंत्रालय, मुंबई - ३२.

३०) वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

३१) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*****